सन २०२२-२३ मध्ये राज्यस्तरीय महालक्ष्मी सरस प्रदर्शन तसेच विभागस्तरीय व जिल्हास्तरीय विक्री प्रदर्शने आयोजित करण्यासाठी निधीचे वितरण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रदर्शने २०२२/प्र.क्र.५७/योजना-१**
बांधकाम भवन,तळमजला
२५, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई-४०० ००१
दिनांक: ३१ मार्च, २०२३

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः पणन-२००८/प्र.क्र.७३८/योजना-१,दिनांक २७ फेब्रुवारी, २००९
२) शासन निर्णय समक्रमांक दिनांक ०६ फेब्रुवारी, २०२३

**शासन निर्णय -**

शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक : पणन- २००८/प्र.क्र.७३८/योजना-१, दिनांक २७ फेब्रुवारी, २००९ अन्वये महालक्ष्मी सरस प्रदर्शनाच्या धर्तीवर स्वयंसहाय्यता महिला बचत गटाच्या उत्पादित मालाची विक्री व प्रदर्शनासाठी विभागीय व जिल्हा़स्तरीय विक्री प्रदर्शने आयोजित करण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. त्यानुसार विभागस्तरीय प्रदर्शनाकरीता प्रत्येकी रु. २५.०० लक्ष व जिल्हास्तरीय प्रदर्शनाकरीता प्रत्येकी रु. १०.०० लक्ष, त्याचप्रमाणे राज्यस्तरावर दरवर्षी आयोजित करण्यात येणाऱ्या महालक्ष्मी सरस प्रदर्शनासाठी रु.५०.०० लक्ष इतके अर्थसहाय्य देण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. या सर्व प्रदर्शनाकरीता सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रू. ५४०.०० लक्ष इतक्या निधीच्या ६० टक्के तरतूद रु. ३२४.०० लक्ष इतक्या तरतूदीचे वितरण उपरोक्त वाचा क्र. २ येथील दि. ०६ फेब्रुवारी, २०२३ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आलेले आहे.

२. उमेद-महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, बेलापूर, नवी मुंबई तसेच विभागीय आयुक्त कार्यालय अमरावती व नागपूर, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा नांदेड, चंद्रपूर व वाशिम यांनी प्रदर्शनाचे आयोजन करण्यात येऊन निधी खर्च करण्यात आल्याचे कळवून उर्वरित ४० टक्के तरतूदीची मागणी केली आहे. जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, सिंधुदूर्ग, बीड व अमरावती यांनी वितरीत केलेला निधी खर्च होणार नसल्याचे कळविले आहे. सदर तीनही जिल्ह्यांना वितरीत केलेल्या प्रत्येकी रु. ६ लक्ष प्रमाणे एकूण रु. १८.०० लक्ष इतका बीम्स प्रणालीवर उपलब्ध निधी प्रमाणात महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, विभागीय आयुक्त कार्यालय अमरावती व नागपूर, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा नांदेड, चंद्रपूर व वाशिम यांना या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

३. सबब, राज्यस्तरीय महालक्ष्मी सरस प्रदर्शनासाठी रु. १८.०० लक्ष इतका निधी सोबतच्या विवरणपत्र "अ" मध्ये दर्शविल्याप्रमाणे अर्थसंकल्पिय वितरण प्रणाली (BDS) व्दारा वितरीत करण्यात येत आहे.

४. राज्यस्तरीय महालक्ष्मी सरस प्रदर्शनासाठी आयोजनासाठी असलेली रक्कम मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, नवी मुंबई यांचेकडे, विभागीय विक्री प्रदर्शन व जिल्हा स्तरीय विक्री प्रदर्शनांसाठी असलेल्या रकमा संबंधित उपायुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालय व संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचेकडे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सुपूर्द करण्यात येत आहेत.

५. सदरचा खर्च सोबतच्या विवरण पत्रात स्वतंत्रपणे दर्शविल्यानुसार मागणी क्रमांक एल-३, "२५०१ ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वयंरोजगार कार्यक्रम, १०१, सुवर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजना, (०१) सुवर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजना, (०१) (०४) प्रदर्शने भरवणे व कायमस्वरूपी विक्री केंद्र बांधणे (कार्यक्रम) (२५०१ १९९३) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व सन २०२२-२३ च्या मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

६. हे अनुदान ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेले आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे अन्यथा ही वित्तीय अनियमितता समजण्यात येईल याची अंमलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी. तसेच संदर्भाधिन दिनांक २७ फेब्रुवारी, २००९ च्या शासन निर्णयातील कार्यपध्दतीचे पालन करावे.

७. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या अनुदानाबाबत संबंधितांनी उपयोगिता प्रमाणपत्र योजना-१ कार्यासनास सादर करावे. तसेच पुढील माहिती त्वरीत लेखाधिकारी, कार्यासन योजना-२, ग्राम विकास विभाग यांचेकडे पाठवावी. (१) मंजूर केलेली रक्कम, (२) कोषागारातून काढलेली रक्कम, (३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक.

८. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक विअप्र- २०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/विनियम, भाग-२ दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग-एक, उप विभाग - तीन अनुक्रमांक चार परिच्छेद क्रमांक २७(२) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय प्राधिकारान्वये तसेच वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२ मधील अटी व शर्तींची पूर्तता होत असल्याने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३११३००२७३२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Manoj Dattatray Jadhav

Digitally signed by Manoj Dattatray Jadhav
DN: cn=Manoj Dattatray Jadhav, o=Rural Development Department, Mantralay, ou, email=manoj.jadhav68@nic.in, c=IN
Date: 2023.03.31 13:31:30 +05'30'

**(मनोज जाधव)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (ले. व अ.) (ले.प.), महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२ नागपूर.

२. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी मुंबई
४. जिल्हा कोषागार अधिकारी/उप कोषागार अधिकारी, (ठाणे, सिंधुदूर्ग, बीड, नांदेड, नागपूर, चंद्रपूर, अमरावती, वाशिम)
५. विभागीय आयुक्त, (कोकण, औरंगाबाद, अमरावती, नागपूर)
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, (सिंधुदूर्ग, बीड, नांदेड, अमरावती, वाशिम, चंद्रपूर,)
७. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, (सिंधुदूर्ग, बीड, नांदेड, अमरावती, वाशिम, चंद्रपूर)
८. कक्ष अधिकारी, कार्यासन - वित्त-१
९. लेखाधिकारी, कार्यासन - योजना-२
१०. निवड नस्ती, योजना-१ कार्यासन

शासन निर्णय ग्राम विकास विभाग क्रमांक : प्रदर्शने २०२२/प्र.क्र.५७/योजना-१,
दिनांक : २९ मार्च, २०२३ सोबतचे विवरणपत्र.

(रुपये लाखात)

| अ.क्र. | विभाग / जिल्हा | मागणी क्रमांक एल-३, २५०१-ग्रामीण विकासासाठी विशेष कार्यक्रम, १०१-स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजना (०१) (०४) प्रदर्शने भरवणे व कायमस्वरुपी विक्री केंद्र बांधणे (२५०१ १९९३) ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर)" | | |
|---|---|---|---|---|
| | | यापूर्वी वितरीत केलेली तरतूद | आता वितरीत करावयाची तरतूद | एकूण |
| **राज्यस्तरीय प्रदर्शने** | | | | |
| १ | उमेद-महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान | ३०.०० | (+) ६.९४ | ३६.९४ |
| **विभागस्तरीय प्रदर्शने** | | | | |
| २ | अमरावती विभाग | १५.०० | (+) ३.४६ | १८.४६ |
| | नागपूर विभाग | १५.०० | (+) ३.४६ | १८.४६ |
| **जिल्हास्तरीय प्रदर्शने** | | | | |
| ३ | सिंधुदूर्ग | ६.०० | (-) ६.०० | ०.०० |
| ४ | बीड | ६.०० | (-) ६.०० | ०.०० |
| ५ | अमरावती | ६.०० | (-) ६.०० | ०.०० |
| ६ | नांदेड | ६.०० | (+) १.३८ | ७.३८ |
| ७ | चंद्रपूर | ६.०० | (+) १.३८ | ७.३८ |
| ८ | वाशिम | ६.०० | (+) १.३८ | ७.३८ |
| | **एकूण** | **९६.००** | **०.००** | **९६.००** |